**नगर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई येथील मुख्य शाखेत ११ आणि दिंडोशी शाखा येथील ५ अशा एकूण १६ समर्पित व्यावसायिक/ वाणिज्यिक न्यायालयांतील (Dedicated Commercial Courts) एकूण ११२ अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : विशेन्या १३२३/प्र.क्र.१९/का-९**
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२,
दिनांक :-२८ फ़ेब्रुवारी, २०२४.

**वाचा:** १) विधि व न्याय विभाग, शासन निर्णय क्र:विशेन्या १३१६/प्र.क्र.१४/का-९, दि.१३.०९.२०१९
२) समक्रमांकाचा शासन निर्णय दि.२१.०९.२०२३.
३) नगर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई यांचे पत्र जा.क्र.सी/८२/३८३/२०२३, दि.०६.०२.२०२४.
४) वित्त विभाग शासन निर्णय क्र. पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क, दि.२१.०२.२०२४

**प्रस्तावना :**

संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये नगर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई यांच्या आस्थापनेवरील मुख्य शाखेत ११ आणि दिंडोशी शाखा येथे ५ याप्रमाणे एकूण १६ समर्पित व्यावसायिक/वाणिज्यिक न्यायालये स्थापन करण्यास मान्यता देण्यात आलेली असून, सदर न्यायालयांकरीता १६ न्यायाधीश व ९६ सहाय्यभूत कर्मचारी अशी एकूण ११२ अस्थायी पदे निर्माण करण्यात आली आहेत. सदर अस्थायी पदांना संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णयान्वये दि.२९.०२.२०२४ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती.

सदर अस्थायी पदे दि.०१.०३.२०२४ पासून पुढे सुरु ठेवण्याची विनंती नगर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई यांनी संदर्भ क्र. ३ येथील प्रस्तावान्वये केली आहे. संदर्भ क्र.४ येथील वित्त विभागाच्या शासन निर्णयान्वये दि.०१.०३.२०२४ ते दि.३१.०८.२०२४ या कालावधीकरीता अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेले आहेत. त्यानुसार सदर अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

नगर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई यांच्या आस्थापनेवरील मुख्य शाखेत ११ आणि दिंडोशी शाखा येथे ५ अशा एकूण १६ समर्पित व्यावसायिक/वाणिज्यिक न्यायालयांतील १६ न्यायाधीश व ९६ सहाय्यभूत कर्मचारी अशा एकूण ११२ अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२४ ते दि.३१.०८.२०२४ या कालावधीकरीता मुदतवाढ देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | पदसंख्या |
|---|---|---|
| १ | जिल्हा न्यायाधीश | १ |
| २ | लघुलेखक (उच्च श्रेणी) | १ |
| ३ | शिरस्तेदार | १ |
| ४ | लिपिक-टंकलेखक | १ |

| | | |
|---|---|---|
| ५ | दुभाषी | १ |
| ६ | शिपाई | २ |
| प्रत्येक व्यावसायिक न्यायालयाकरिता एकूण पदे | | ७ |
| १६ समर्पित व्यावसायिक न्यायालयाकरीता एकूण पदे(१६ x ७) | | **११२** |

२. याकरिता येणारा खर्च "मागणी क्रमांक जे-१, २०१४-न्यायदान, १०५- नगर दिवाणी व सत्र न्यायालये, (०१) मुंबई शहर दिवाणी व सत्र न्यायाधीश, (०१) (०१) मुंबई शहर दिवाणी व सत्र न्यायाधीश अनिवार्य (२०१४ ०१६३)" या लेखाशिर्षाखाली संबंधित वित्तीय वर्षासाठी मंजूर होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. वित्त विभाग शासन निर्णय क्र. पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क, दि.२१.०२.२०२४ द्वारे प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेतांक २०२४०३०५१८१९११४८१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NANDKISHOR LALLU MORE

Digitally signed by NANDKISHOR LALLU MORE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT,
2.5.4.20=8e6e6ef027afaf311b73f55b93d66802f7572a9502432
8e2d647f7ef65a9432a, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=69426D4C260E75A2AE012E47A93A468B42FD9
B82A0B40FBCADEA1F0C509379CC, cn=NANDKISHOR LALLU MORE
Date: 2024.03.05 18:28:25 +05'30'

**( नंदकिशोर ल. मोरे )**
**विधि सल्लागार-नि-सह सचिव**

**प्रति :-**

१. मा.महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई,
२. मा. प्रबंधक (निरिक्षणे-१), मा.उच्च न्यायालय, मुंबई,
३. प्रधान न्यायाधीश, नगर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई,
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
६. महालेखापाल -एक (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई,
७. विधि व न्याय विभाग कार्यासन-११,२३,२४,२५,
८. निवडनस्ती- कार्या.९.